नवनिर्मित ग्रामीण रुग्णालय, वडवणी, जिल्हा बीड येथील इमारत बांधकामाचे अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-२०२४/ प्र.क्र.३०४/ आरोग्य-४**
मंत्रालय, १० वा मजला, संकुल इमारत,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मंत्रालय, मुंबई.
तारीख: २९ ऑगस्ट, २०२४.

**वाचा :-** उपसंचालक आरोग्य सेवा (रुग्णालय), मुंबई यांचे पत्र क्रमांकः आआसे/कक्ष-३/- टे-६/ग्रारुवडवणी/३० खाटा बांधकाम/१५८५१-५२/२४,दिनांक २३.०८.२०२४

**प्रस्तावना :-**

नवनिर्मित ग्रामीण रुग्णालय, वडवणी जिल्हा बीड येथिल रुग्णालय इमारत बांधकामाचे रु.१४,९४,५०,०००/- इतक्या रकमेचे अंदाजपत्रक कार्यकारी अभियंता,सार्वजनिक बांधकाम विभाग,बीड यांनी तयार केले असून सदर अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यासंदर्भात पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

नवनिर्मित ग्रामीण रुग्णालय, वडवणी जिल्हा बीड येथिल इमारत बांधकामाचे रु.१४,९४,५०,०००/- (रुपये चौदा कोटी चौ-याण्णव लक्ष पन्नास हजार फक्त) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

२. उपरोक्त अंदाजपत्रकाची प्रशासकीय मान्यता पुढील अटी व शर्तीच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती-:**

१) काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तु विशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.
२) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.
३) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दि. १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.
४) सदर कामाच्या बांधकामाचा खर्च सार्वजनिक आरोग्य विभागाने त्यांच्याकडे उपलब्ध असलेल्या नियतव्ययामधून करण्यात यावा.
५) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्रमांक बीडीजी-२०१७/प्र.क्र.६०/इमा-२, दि.०७.०७.२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.
६) नियोजित जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन सदर कामाच्यानिविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

३. सदर बांधकामांवरील खर्च "मुख्य लेखाशिर्ष - ४२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च,०२-ग्रामीण आरोग्य सेवा (वैद्यकीय सहाय्य),११०-रुग्णालये व दवाखाने ०४-सार्वजनिक आरोग्य,१०४–सामुहिक आरोग्य केंद्र, (००४०१), मोठे बांधकामे (४२१० ०३९१), ५३ - मोठी बांधकामे" या लेखाशिर्षाखाली मंजूर करण्यात आलेल्या अनुदानामधून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या शा.नि. क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम,भाग-२, दि.१७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्ट भाग-पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक १ परिच्छेद क्र.१३४ नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८१३१७४९३६७६१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KAVITA PRADIP PISE

Digitally signed by KAVITA PRADIP PISE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH AND FAMILY WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=895d4dc43ba3105440c0329431446ae8333ab89578925b2d77d3806165dbd487, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AEEF37624AA6E5EA1AAA99D244C6C2A5F135097E5C07486A35D423835B4EC728, cn=KAVITA PRADIP PISE
Date: 2024.08.29 19:34:44 +05'30'

**(कविता पिसे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल, ( लेखा व लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई
४. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), मुंबई/ पुणे.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा परिमंडळ,लातूर.
६. सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा ),आरोग्य सेवा, पुणे.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, बीड.
८. जिल्हा शल्य चिकित्सक, बीड.
९. विनियम कार्यासन, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. कार्यासन अधिकारी ( अर्थसंकल्प ), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
११. निवडनस्ती ( आरोग्य-४ ).